अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरीता शुल्काचे प्रदान या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशिर्ष २२२५ डी २५१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०४ मार्च,२०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.०१.२०२२.
२) आ.वि.वि. शासन परिपत्रक, क्र.वहका-२०१८/प्र.क्र.४३/का-१४, दि.११.५.२०१८.
३) आदिवासी विकास विभाग शा.नि. क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्या-६, दि.२७.९.२०२१
४) आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयाचे पत्र क्र.आसंप्रसं-२०२२/ वहका-६२/का.४/४८, दि.०३.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम, २००६ नियम, २००८ व सुधारणा नियम, २०१२ ची कोटेकोर अंमलबजावणी करुन वनहक्क दावे व अपील यांचा कालबध्द निपटारा करण्यासाठी “वनमित्र योजना” राबविण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. या अंतर्गत जिल्हास्तरीय वनहक्क समितीने मान्य केलेल्या वैयक्तिक वनहक्क दाव्यांमधील वनक्षेत्र भूमी अभिलेख विभागाकडून मोजण्याची कार्यवाही करण्यात येत असल्याने याकरीता आवश्यक निधी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत “नोडल एजन्सी” म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन देण्यात येतो. या अनुषंगाने वनहक्क दाव्यांमधील वन जमिनींची मोजणी भूमी अभिलेख कार्यालयांकडून करण्याकरीता संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी केलेल्या मागणीस अनुसरुन निधी उपलब्ध करुन देण्याबाबत आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून संदर्भाधीन क्र.४ अन्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचितजाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक या मुख्य लेखाशिर्षाखाली अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरीता शुल्काचे प्रदान करण्यासाठी सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी अंतर्गत वाटप केलेल्या वनजमिनीची मोजणी करण्याकरीता शुल्काचे प्रदान | २२२५ डी २५१ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ६००.०० | ३८५.९० | २१४.१० |
| | **एकूण** | | **६००.००** | **३८५.९०** | **२१४.१०** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२१४.१० लाख (अक्षरी रुपये दोन कोटी चौदा लाख दहा हजार फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. विभागप्रमुख/नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.०१.२०२२ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.१ येथील शासन निर्णयांन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७११२२५८७१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.06 16:32:21 +05'30'

**रविंद्र दि.औटे**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. आयुक्त, आदिवासी व संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. जिल्हाधिकारी, औरंगाबाद/यवतमाळ/गडचिरोली/कोल्हापूर/नाशिक/नांदेड/नंदूरबार/चंद्रपूर/पालघर/हिंगोली.
७. प्रकल्प अधिकारी, औरंगाबाद/ यवतमाळ/ पांढरकवडा/ पुसद/ अहेरी/ भामरागड/ गडचिरोली/ घोडेगाव/ कळवण/नाशिक/किनवट/तळोदा/नंदुरबार/देवरी/चिमूर/चंद्रपूर/डहाणू/जव्हार.
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१४, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (कार्या-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.